**पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या जल जीवन मिशन करिता सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन (पीएफएमएस) प्रणाली कार्यान्वित करण्याकरिता बँकेच्या निवडीबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राग्रापे-२०१९/ प्र.क्र.९९/ पापु-१०**

जी.टी. हॉस्पीटल इमारत, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
तारीखः १ नोव्हेंबर, २०१९

**वाचा-**

१) केंद्र शासनाचे पत्र क्र.एस११०१२/ ३(१) रेफ.केस/२०१०/ आरबीडी१६८८-१७७२, दि.१०.११.२०१६
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासननिर्णयक्रमांकः संकीर्ण २०१४/ प्र.क्र.२९/ कोषा प्रशा-५, दि.१७.१०.२०१६
३) केंद्र शासनाचे पत्र क्र.सी-१३०१५ (२६४-XII) एमएफसीजीए/ पीएफएमएस/ २०१८-१९/२००३१-२००८०, दि.२२.०३.२०१९
४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,शासननिर्णयक्रमांकःराग्रापे-२०१९/प्र.क्र.९९/ पापु-१०, दि.०७.१०.२०१९

**प्रस्तावना-**

केंद्र पुरस्कृत योजनांच्या संनियंत्रणाकरिता सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (पीएफएमएस) ची अंमलबजावणी करण्यात येणार आहे. तसेच यापुढे केंद्र शासनाकडून केंद्रपुरस्कृत योजनांचा निधी सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीव्दारे वितरीत करण्यात येणार आहे. सदर प्रणालीत राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम/ जल जीवन मिशन अंतर्गत सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन (पीएफएमएस) कार्यान्वित करण्यासाठी बँकेची निवड करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

केंद्र शासनाच्या सार्वजनिक वित्तीय प्रणाली (Public Finance Management System) या प्रणालीसाठी राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम/ जल जीवन मिशनकरिता विभागाचा बँकींग पार्टनर निवडण्यासाठी संदर्भाधिन दि.७.१०.२०१९ च्या शासन निर्णयान्वये नियुक्त करण्यात आलेल्या समितीची बैठक दि.९.१०.२०१९ रोजी आयोजित करण्यात आलेली होती. सदर बैठकी दरम्यान संबंधित बँकांव्दारे करण्यात आलेल्या सादरीकरणाच्या अनुषंगाने राज्यात राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम /जल जीवन मिशनसाठी (Public Finance Management System) अंतर्गत राज्य व जिल्हा स्तरावरील खाते उघडण्यासाठी बँकींग पार्टनर म्हणून आयसीआयसीआय बँकेची समितीकडून निवड करण्यात आलेली आहे.

समितीच्या सदर निर्णयाच्या अनुषंगाने पीएफएमएससाठी राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम /जलजीवन मिशन करिता आयसीआयसीआय बँकेची बँकींग पार्टनर म्हणून निवड करण्यास मान्यता देण्यात येत आहे. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम /जल जीवन मिशन अंतर्गत पीएफएमएस व तद-अनुषंगिक सर्व बाबी कार्यान्वित करण्याची जबाबदारी आयसीआयसीआय बँकेची राहील. बँकेने केंद्र शासनाच्या सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन (PFMS)प्रणाली संबंधीची मार्गदर्शक तत्वे व त्या संबधी केंद्र शासनाच्या सुरक्षा सूचना (Security advisory )यांचे तंतोतंत पालन करणे बंधनकारक राहील. त्यानुषंगाने सर्व अटी व शर्ती वेळोवेळी निर्गमित करण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११०११४४३०६५३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्य पाल्यांच्या आदेशानुसार व नावाने.

VASANT BHIMRAO MANE

Digitally signed by VASANT BHIMRAO MANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VASANT BHIMRAO MANE
Date: 2019.11.01 16:48:39 +05'30'

( वसंत माने )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

२. प्रधान सचिव, पाणी पुरवठा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
३. महालेखापाल (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१-मुंबई/२-नागपुर,
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/ नागपूर
५. नियोजन विभाग(कार्यासन १४४३)/ वित्त विभाग(व्यय-३), मंत्रालय, मुंबई,
६. सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मुंबई.
७. विभागीय आयुक्त, सर्व,
८. संचालक,भूजल सर्व्हेक्षण व विकास यंत्रणा,पुणे.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
१०.प्रमुख व्यवस्थापक , आयसीआयसीआय बँक,मुंबई.
११.संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर
१२.उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
१३.कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद,सर्व
१४.जिल्हा कोषागार अधिकारी,सर्व
१५.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/ नागपूर,
१६.पापु-०४/१८, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७ .निवडनस्ती पापु-१०.